भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यां करीता घेण्यात येणाऱ्या विभागीय परीक्षेच्या कार्यपद्धतीत व अभ्यासक्रमा मध्ये सुधारणा करण्याबाबत.......

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः आयपीएस-३६१६/प्र.क्र.१०३/पोल-१

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई-४०००३२.
दिनांक: १० जानेवारी, २०१९

**वाचा** :- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. ९५८०/५-IV, दिनांक ०९.०५.१९५५
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक पोमंस/ १/ विभागीय परीक्षा/२२८/२००७, दिनांक-०१.०२.२०१७
३) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पी. १ (२)/ (१७)/एक, दिनांक २६.०७.२०१८

**प्रस्तावना :-**

भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांची सेवाजेष्ठता ही केंद्रीय लोकसेवा आयोगाच्या घेण्यात आलेल्या परिक्षेमध्ये मिळविलेले गुण व राष्ट्रीय पोलीस अकादमीत प्राप्त झालेल्या गुणांचा विचार करुन ठरविली जाते. त्यामुळे विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्याचा त्यांच्या सेवाज्येष्ठतेवर कोणताही परिणाम होत नाही. तथापि, महाराष्ट्र राज्याचे प्रचलित कायदे व नियम यांचे ज्ञान महाराष्ट्र संवर्गातील भापोसे अधिकाऱ्यांना असणे आवश्यक असल्याने त्यांची विभागीय परीक्षा महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येत आहे.

२. भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांसाठी आयोजित करण्यात येत असलेल्या विभागीय परीक्षेकरीता एकच सामाईक परीक्षा घेण्यासाठी प्रस्तुत पदांच्या विभागीय परीक्षेच्या परीक्षा नियम व अभ्यासक्रम यामध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केली होती. तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगास भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांच्या विभागीय परीक्षा नियमीत घेण्यास अडचणी येत होत्या. तसेच त्यामुळे विहित केलेल्या कालावधीत विभागीय परीक्षा न झाल्याने भापोसे अधिकाऱ्यांचे आर्थिक नुकसान होत होते. कालानुरुप विविध कायद्यामध्ये सुधारणा झालेल्या होत्या. यास्तव वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या सदरच्या परीक्षेच्या कार्यपद्धतीत व अभ्यासक्रमात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

३. महाराष्ट्र संवर्गातील भारतीय पोलीस सेवा संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्व प्रकारच्या प्रशिक्षणाबाबत अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई

यांच्याकडून कार्यवाही करण्यात येत असते. सबब, सदरच्या परीक्षा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाऐवजी अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, म.रा. मुंबई व संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्यामार्फत घेण्याची बाबही शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

४. महाराष्ट्र संवर्गातील भारतीस पोलीस सेवेमधील अधिकारी यांची विभागीय परीक्षा ही यापुढे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाऐवजी अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्यामार्फत घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. आतापर्यंत विविध तुकड्यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाद्वारे प्रलंबित असलेली विभागीय परीक्षासुद्धा अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे घेतील. तसेच सदर परीक्षेस खालील अटी व शर्ती लागू राहतील.

**अटी व शर्ती :-**

१) अद्यापर्यंत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे प्रलंबित असलेली परीक्षा महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक ने ६ महिन्यांच्या आत आयोजित करावी.

२) सदर विभागीय परीक्षा प्रत्येक वर्षी जानेवारी व जुलै महिन्यात अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, म.रा. मुंबई व संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्यामार्फत संयुक्तरित्या तुकडी निहाय घेण्यात येईल.

३) सदर विभागीय परीक्षा, महाराष्ट्र संवर्गात हजर झाल्याच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत, संबंधित अधिकारी यांनी उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. विहित कालावधीत संबंधित अधिकारी विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाले नाहीत तर त्यांची देय वेतनवाढ ते विभागीय परीक्षा उत्तीर्ण होई पर्यंत रोखून धरण्यात येईल.

४) गृह विभागाच्या दि. ०९.०५.१९५५ च्या शासन निर्णयान्वये विभागीय परीक्षेकरीता विहित करण्यात आलेल्या अभ्यासक्रमामध्ये सुधारणा करुन सोबत जोडलेल्या अभ्यासक्रमानुसार बदल करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

५) गृह विभाग शासन निर्णय क्र. ९५८०/५-IV दिनांक ०९.०५.१९५५ मधील इतर अटी व शर्ती लागू राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१९०११०१६२६१४३६२९ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2019.01.10 16:35:40 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे/ ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. अ.मु.स.(गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अ.मु.स.(अ. व सु.) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. अपर पोलीस महासंचालक, (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक
११. अपर पोलीस महासंचालक,गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे.
१२. सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक (द्वारा:-पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई)
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ / २, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१४. सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती, कार्यासन पोल-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

# शासन निर्णय क्र:आयपीएस-३६१६/प्र.क्र.१०३/पोल-१, दिनांक-१०.०१.२०१९ सोबतचे परिशिष्ट

## Syllabus for the written examination prescribed for the Indian Police Service officers

### PAPER NO.01

### MINOR ACTS (WITH BOOKS)

| NO. | TOPICS | SECTIONS |
|---|---|---|
| 01 | Prevention of Atrocities on SC/ST Act, 1989 [ THE SCHEDULED CASTES AND THE SCHEDULED] (Prevention of Atrocities Amendment Ordinance,2014 | 2,3,4,5,10,14,14A,18 Chapter Iv A, Schedule [Amendments to the See.2,3,4,10,14,14A.] |
| 02 | Prevention of Damage to Public Property Act,1984 | 2 to 6 |
| 03 | Motor Vehicle Act ,1988 | 2 to 5, 39, 66, 112, 119, 130, 132, 134, 141 to 146, 177 to 188, 190, 192, 194, 196, 201, 204, 206, 207. |
| 04 | Maharashtra Motor Vehicles Rules,1989 | (20-24, 34 , 58, 77-84, 95-969, 102-103, 108, 110, 115-117, 120, 122, 161-163, 168, 173 , 222, 226, 228-245, 250. |
| 05 | Arms Act,1959 | 2, 3 to 12, 17, 19 , 25 to 30, 39. |
| 06 | Explosives Act,1884 | Entire Act |
| 07 | Explosive Substances Act,1908. | Entire Act |
| 08 | Immoral Traffic (Prevention) Act,1956. | 2 to 9,13 , 14, 15, 16, 17, 20, 21 |
| 09 | The Right to information Act,2005. | 1 to 11, 15 , 18 to 25, 27. |
| 10 | Unlawful Activities Prevention Act,1967 | Entire Act |
| 11 | NDPS Act,1985 | 2, 8, 9, 10, 15 to 32, 37, 41 to 58, 63. |
| 12 | PIT NDPS Act, 1988 | Entire Act |
| 13 | Maharashtra Prevention of Gambling Act,1887. | Entire Act |
| 14 | Maharashtra Prohibition Act, 1949 | Sec.2, 11-24A, 79-97 ,116A-122, 65-67A, 68-70, 71, 74, 76-78, 123-29, 129A, 131, 133, 134, 135, 141, 142, 145, 146, 146A. |
| 15 | Juvenile Justice (Care & Protection of Children ) Act,2000<br>Juvenile Justice Central / State Rules | Chapter II & III.(Secs. 4 to 39)<br>Sec.2, 3<br>Rule 1 to 11 |
| 16 | Protection of Woman from Domestic Violence Act, 2005. | 2 to 5, 8 to 11, 18,19, 20, 21, 31. |

| | | |
|---|---|---|
| 17 | Indecent Representation of Woman (prohibition) Act, 1985. | 2 to 8 |
| 18 | Prohibition of smoking in public places Rules, 2008. | 1 to 5 |
| 19 | Cinematograph Act,1952. | 2, 12A, 7, 7A, 10, 14. |
| 20 | Cable TV Network Regulation Act,1995. | 2, 2A, 2B, 3 to 8 , 10, 11, 16, 18 |
| 21 | The Dowry Prohibition Act, 1961. | 2, 3, 4, 4A, 5 to 8 |
| 22 | The Copyright Act, 1957. | 2, 13, 14, 30, 44, 51, 52, 63, 63A, 64, 65, 66, 67, 68, 68A, 69, 70. |
| 23 | National Security Act, 1980. | 3, 4, 5, 7, 8, 9, 14. |
| 24 | Prevention of Money Laundering Act, 2002. | 1 to 8, 11, 16 to 20, 41, 42, 44, 45, 59, 62, 63, 64, |
| 25 | Prevention of Corruption Act, 1988. | 2, 7, 8, 9, 12, 13. |

# शासन निर्णय क्र:आयपीएस-३६१६/प्र.क्र.१०३/पोल-१, दिनांक-१०.०१.२०१९ सोबतचे परिशिष्ट

## Syllabus for the written examination prescribed for the Indian Police Service officers

### PAPER NO.02

| NO. | TOPICS | SECTIONS |
|---|---|---|
| 01 | Prevention of Food Adulteration Act, | 2, 5, 6, 7, 10, 16, 16A, 17, 18, 20, 21. |
| 02 | Police Force (Restrictions of Rights) Act, 1966. | 2,3,4. |
| 03 | Police (Incitement to Disaffection) Act,1992. | 2, 3, 4, 5, 6. |
| 8i[04 | Essential Commodities Act, 1955. | 2, 3, 6A, 7, 8, 9, 10, 10A, 10C, 11. |
| 05 | Official Security Act, 1923. | 2, 3, 4, 5, 6, 7, 10, 13. |
| 06 | Representation of Peoples Act,1951. | 2, 125, 125A, 126, 126A, 126B, 127, 127A, 128, 129, 130, 131, 132, 132A, 133, 134, 134A, 134B, 135, 135A, 135B, 135C, 136. |
| 07 | Private Security Agencies (Regulation) Act, 2005 and Rules. | 2, 4, 20, 21, 22. |
| 08 | The I.T. Act – 2000 | Sec.2, 43, 65- 67C, 70A,B, 72A, 75, 76, 77A, 77B,78. |
| 09 | The Prevention of Insults to National Honour Act,1971. | 2, 3, 3A. |
| 10 | The Maharashtra village Police Act,1967 | Entire Act |
| 11 | Maharashtra Prevention of Ragging Act, 1999. | Entire Act |
| 12 | Maharashtra Control of Organized Crime Act, 1999 with simulated case | Entire Act |
| 13 | The Maharashtra Prevention of Dangerous Activities of slum Lords, Bootleggers and Drug Offenders Act, 1985 with case study. | Entire Act |
| 14 | The Maharashtra Lotteries (Control and Tax ) and Prize Competitions (Tax) Act,1958. | 1 to 23 |
| 15 | Noise Pollution (Regulation of Control ) Rules 2000. | Rule: 01 to 08 |
| 16 | Maharashtra Protection of Interest of Depositors in Financial Establishment Act, 1999 | Entire Act |
| 17 | Maharashtra Money- Lending (Regulation ) Amendment Act,2014. | Entire Act |

| | | |
|---|---|---|
| 18 | Maharashtra Medicare Service Persons & Medicare service Institutions (Prevention of Violence & Damage or Loss to Property) Act,2010. | Entire Act |
| 19 | Maharashtra Prevention and Eradication of Human Sacrifice and other Inhuman, Evil and Aghori Practices and Black Magic Act, 2013. | Entire Act |
| 20 | Protection of Children form Sexual Offences Act, 2012. | Entire Act |
| 21 | Foreigners Act, 1946. | Entire Act |
| 22 | The Passport Act,1967. | Entire Act |
| 23 | Registration of Foreigners Act, | Entire Act |
| 24 | The Sexual harassment of woman at workplace (Prevention, Prohibition and Redressal) Act, 2013. | Entire Act |

# शासन निर्णय क्र:आयपीएस-३६१६/प्र.क्र.१०३/पोल-१, दिनांक-१०.०१.२०१९ सोबतचे परिशिष्ट

## Paper - III

**Police Manual and Miscellaneous police subject (with book)**

1. The Police Manual, Volumes I and III
2. Miscellaneous Police subjects ( Practical Notes, Criminal cases in the Maharashtra State, i) Maharashtra Civil services Conduct Discipline and Appeal Rules) 1979.ii)Maharashtra Civil Services (Conduct Rule 1979)

## Paper - IV

**Accounts- (With Books)**

**1.** The Police Manual, Volume II

2. Bombay Financial Rule 1959, Chapter 1, 2, 4, 5, 6, ( expect pt. II of section II ) 11 and 12 ( expect Rule 158) vide G.R. Home Department No. O.P.O.1756/48394(a) I & 22-09-2060

3. The Bombay Civil Services Rules Manual ( Financial Publication No. V), Chapters I, II, III (expect Rule 26), Iv (expect Rules 39 and 75 ), V (expect Rule 99),VII (expect Rulee160), IX (expect Rule 161(d), X, XI (expect section VI, VII and VIII),Chapter XVI and XVII

## Paper - V

Director General of Police’s Standing Orders (With Books)